**विशेष संक्षिप्त पुनरीक्षण कार्यक्रम, २०२४ अंतर्गत कृषी विद्यापीठे व त्या संलग्न महाविद्यालयांतील विद्यार्थ्यांची मतदार यादीमध्ये मतदार म्हणून नाव नोंदणी करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन,**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्सव्यवसाय विभाग**
**परिपत्रक क्र. संकिर्ण-१५२३/ प्र.क्र. १२२/६अे,**
मादाम चौक, कामा रोड, हुतात्मा राजगुरु
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दि. २६ जुलै, २०२३.

**वाचा**:-१. भारत निवडणूक आयोगाचे पत्र क्र. २३/२०२३-ERS (VolII.), दि.२९.५.२०२३,
२. भारत निवडणूक आयोग यांचे पत्र ४९१/ECI/LET/FUNC/SVEEP II/Vol/SSR/२०२३, दि. १३.०६.२०२३.
३. अपर मुख्य सचिव तथा मुख्य निवडणूक अधिकारी यांचे अर्धशासकीय पत्र क्र. संकीर्ण-२०२३/प्र.क्र.३८९/२३/३३, दिनांक ३० जून, २०२३.
४. अपर मुख्य सचिव तथा मुख्य निवडणूक अधिकारी यांचे अर्धशासकीय पत्र क्र. संकीर्ण-२०२३ / प्र.क्र.३८९ /२३/३३, दिनांक ५ जुलै, २०२३.

## परिपत्रक

भारत निवडणूक आयोगाकडून दरवर्षी विशेष संक्षिप्त पुनरीक्षण कार्यक्रमांतर्गत अस्तित्वात असलेल्या मतदार यादीची पडताळणी व दुरुस्ती करून ती त्रुटी विरहीत करण्याचा व दि. ९ जानेवारी या अर्हता दिनांकानुसार नवीन मतदार नाव नोंदणी करून मतदार यादी सुधारित करण्याचा कार्यक्रम राबविण्यात येतो. भारत निवडणूक आयोगाने दि.२९.०५.२०२३ रोजीच्या पत्रान्वये विशेष संक्षिप्त पुनरीक्षण कार्यक्रम, २०२४ घोषित केलेला आहे.

विशेष संक्षिप्त पुनरीक्षण कार्यक्रम २०२४ मध्ये दि. १ जानेवारी, २०२४ रोजी १८ वर्ष पूर्ण करणारे नवमतदार यांची नोंदणी करून मतदार यादी सुधारीत करण्याचा कार्यक्रम आयोजित करण्यात येत आहे. तसेच, सन २०२४ या वर्षाच्या दि. ०१ जानेवारी, ०१ एप्रिल, ०१ जुलै व ०१ ऑक्टोबर अशा चार अर्हता दिनांकानुसार वा त्यापूर्वी १८ वर्ष पूर्ण होणाऱ्या नागरिकांना मतदार यादीमध्ये आगाऊ नाव नोंदणी करता येणार आहे. सदर विशेष संक्षिप्त पुनरीक्षण कार्यक्रमांतर्गत दि.१७.१०.२०१३ रोजी राज्यातील सर्व विधानसभा मतदारसंघातील प्रारूप मतदार याद्या प्रसिद्ध करण्यात येणार आहेत व दि. १७.१०.२०२३ ते दि.३०.११.२०२३ या कालावधीत दावे व हरकती (नाव नोंदणीचे अर्ज) स्विकारण्यात येणार आहेत.

२. विशेष संक्षिप्त पुनरीक्षण कार्यक्रम, २०२४ अंतर्गत राज्यातील सर्व कृषी विद्यापीठे व महाविद्यालयातील विद्यार्थ्यांची मतदार यादीमध्ये मतदार म्हणून नाव नोंदणी करण्याचा उपक्रम राबविण्याबाबत अपर मुख्य सचिव तथा मुख्य निवडणूक अधिकारी, महाराष्ट्र राज्य, यांच्याकडून त्यांच्या दि. ३० जून. २०२३ रोजीच्या अर्धशासकीय पत्रान्वये विनंती केली आहे. त्यानुसार मतदार यादीच्या विशेष संक्षिप्त पुनरीक्षण कार्यक्रमाच्या अनुषंगाने राज्यातील सर्व कृषी विद्यापीठे व महाविद्यालयांमध्ये खालील उपक्रम राबविण्यात यावेत:-

१) विद्यापीठ व त्याअंतर्गत येणाऱ्या महाविद्यालयीन विद्यार्थ्यांना निवडणूक साक्षरता मंडळामार्फत विशेष संक्षिप्त पुनरीक्षण कार्यक्रम, २०२४ या कार्यक्रमाची माहिती देण्यात यावी.

२) निवडणूक साक्षरता मंडळामार्फत दि.१७.१०.२०२३ ते दि. ३०.११.२०२३ या कालावधीत, दिनांक ०१.०१.२०२४ रोजी १८ वर्ष वय पूर्ण होत असलेल्या विद्यार्थ्यांकडून नवीन मतदार म्हणून नोंदणी अर्ज भरून घेण्यात यावेत. तसेच, दि.०१ एप्रिल, ०१ जुलै व ०१ ऑक्टोबर या तीन अर्हता

दिनांकांनुसार १८ वर्ष पूर्ण होणाऱ्या विद्यार्थ्यांकडूनही आगाऊ नोंदणी अर्ज भरून घ्यावेत. या अर्जाचे संकलन करून ते संबंधित मतदार नोंदणी अधिकाऱ्याकडे पाठवावेत.

३) राष्ट्रीय सेवा योजना (NSS) व नेहरु युवा केंद्र (NYK) यांच्याशी समन्वय साधून विद्यार्थ्यांची नाव नोंदणी करण्यात यावी.

४) ऑनलाईन माध्यमामार्फत नविन मतदार नोंदणी करण्याबाबत प्रोत्साहित करण्यासाठी विविध उपक्रम राबविण्यात यावेत. निवडणूक साक्षरता बूट कॅम्प, ऑनलाईन प्रश्नमंजुषा स्पर्धा असे विविध उपक्रम राबवून विद्यार्थ्यांना मतदार नोंदणी प्रक्रिया, त्याकरिता लागणारी कागदपत्रे इत्यादीची माहिती मिळण्याच्या दृष्टीने जनजागृती करण्यात यावी.

५) महाविद्यालयीन विद्यार्थ्यांच्या प्रवेश करतेवेळी त्यांच्या प्रवेश अर्जामध्ये विद्यार्थ्याने मतदार यादीत नाव नोंदणी केली आहे किंवा कसे याबाबतचा कॉलम (स्तंभ) समाविष्ठ करावा. तसेच, ज्या विद्यार्थ्यांची मतदार म्हणून नाव नोंदणी झाली नाही अशा विद्यार्थ्यांची यादी तयार करुन ती संबंधित मतदार नोंदणी अधिकारी यांना उपलब्ध करुन द्यावी.

६) महाविद्यालयांमधील दि.१.१०.२०२४ रोजी १८ वर्ष पूर्ण होणाऱ्या प्रत्येक विद्यार्थ्यांची १०० टक्के मतदार नाव नोंदणी करण्यासाठी प्रत्येक महाविद्यालयाच्या प्राचार्यांनी मतदार नोंदणी अधिकारी यांना आवश्यक ते सहकार्य करावे.

७) विद्यापीठ / महाविद्यालय कार्यालयाने संबंधित मतदार नोंदणी अधिकारी कार्यालय/ तहसिल कार्यालयाकडून मतदार नोंदणीसाठी आवश्यक अर्जाचे नमुने उपलब्ध करून घ्यावेत. विद्यार्थ्यांना विहित नाव नोंदणी अर्ज विद्यापीठ / महाविद्यालयांमध्ये उपलब्ध करून दयावेत. विद्यार्थ्यांकडून प्राप्त होणाऱ्या नाव नोंदणीच्या अर्जाचे संकलन करून विद्यापीठ / महाविद्यालयाने संबंधित मतदार नोंदणी अधिकारी कार्यालयाकडे पाठवावे.

३. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२३०७२६१७४९४३१८०१ असा आहे. हे शासन परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRATIBHA MADHAV PATIL

Digitally signed by PRATIBHA MADHAV PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=b693d975fffc642fe6b87c2ce9e1297fd1e8bda9b459f85f75f159984ba680fd, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=DA026E85AE8CBB4E3C2ACDBECBBF2F6D6CB0AE6ED5C1E54483490119EE0456AD, cn=PRATIBHA MADHAV PATIL
Date: 2023.07.26 17:51:07 +05'30'

**(प्रतिभा पाटील)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. अपर मुख्य सचिव तथा मुख्य निवडणूक अधिकारी, मंत्रालय, मुंबई.
३. मा. अपर मुख्य सचिव (कृषि), यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
४. कुलगुरू, सर्व कृषी विद्यापीठे, महाराष्ट्र राज्य
५. कुलसचिव, सर्व कृषी विद्यापीठे, महाराष्ट्र राज्य
६. जिल्हा निवडणूक अधिकारी, सर्व जिल्हे.
७. अधिष्ठाता, सर्व कृषी विद्यापीठे, महाराष्ट्र राज्य
८. निवड नस्ती.